संगणक सांकेतांक-२०१११११८०५५१४१००१

कामगार विभागाच्या अधिपत्याखालील बाष्पके संचालनालय या आस्थापनेचे बळकटीकरण करणे व बाष्पके अधिनियमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,

शासन निर्णय क्र एसबीई - ०३ /२०१० / प्र.क्र ८/कामगार -१

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०८ फेब्रुवारी,२०११.

संदर्भ :- १) प्रभारी संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र एसबी- ४ / लेखाशाखा / २०१० / १९९३७, दिनांक ३१ ऑगस्ट,२०१०

**प्रस्तावना :-**

वार्षिक योजना २०१० च्या मध्यावधी आढाव्याच्या वेळी नियोजन विभागाने कामगार विभागाच्या सन २००९-२०१० मधील ज्या योजनांतर्गत योजनांमध्ये साधर्म्य आहे, अशा योजनांचे एकत्रिकरण करण्याचे निदश दिलेले होते. सन २०१०-११ मधील पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजना " १) बाष्पके संचालनालयाला लागणारी साधनसामग्री जसे की,प्रोजेक्टर,क्षेत्रीय अधिकारी /कर्मचा-यांना Palm top यंत्रणा व तत्सम साधन सामुग्री उपलब्ध करून देणे, २) भारतीय बाष्पके सुधारीत अधिनियम, २००७ मधील सुधारणाबाबत जनजागृती मोहीम राबविणे, ३) बाष्पके कार्यालयासाठी जागा खरेदी करणे, ४) बाष्पके संचालनालयाचे बळकटीकरण करण्याच्यादृष्टिने अन्य योजना राबविणे " या योजनांचे एकत्रिकरण करुन आता एकच योजना करण्याचे प्रभारी संचालक, बाष्पके संचालनालय यांनी प्रस्तावित केलेले आहे. त्यानुसार प्रस्तावित केलेल्या वरील योजनांचे एकत्रितकरण करुन आता बाष्पके संचालनालयाचे बळकटीकरण करणे व बाष्पके अधिनियमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासननिर्णय -**

या विभागाने नियोजन विभागाने सुचित केल्यानुसार चालू असलेल्या योजनांचे एकत्रिकरण करुन बाष्पके संचालनालयाचे बळकटीकरण करणे व बाष्पके अधिनियमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे याबाबत १) बाष्पके संचालनालयाला लागणारी साधनसामग्री जसे की,प्रोजेक्टर,क्षेत्रीय अधिकारी /कर्मचा-यांना Palm top यंत्रणा व तत्सम साधन सामुग्री उपलब्ध करून देणे इत्यादि. २) भारतीय बाष्पके सुधारीत अधिनियम, २००७ मधील सुधारणाबाबत जनजागृती मोहीम राबविणे, ३)बाष्पके कार्यालयासाठी नविन जागा खरेदी करणे, ४) बाष्पके संचालनालयाचे बळकटीकरण

करण्याच्यादृष्टिने अन्य योजना राबविणे, या योजनांचे एकत्रिकरण करुन बाष्पके संचालनालयाचे बळकटीकरण करणे व बाष्पके अधिनियमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे यासाठी शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे.

२. सदर योजनेत खालील बार्बीचा समावेश करण्यांत येत आहे :-

१) बाष्पके संचालनालयाला लागणारी साधनसामग्री जसे की,प्रोजेक्टर,क्षेत्रीय अधिकारी /कर्मचा-यांना Palm top यंत्रणा व तत्सम साधन सामुग्री उपलब्ध करून देणे, :- बाष्पके संचालनालयाला मुख्यालय व क्षेत्रीय कार्यालयात लागणारी साधन सामग्री जसे की,क्षेत्रीय अधिकारी /कर्मचा-यांना,प्रोजेक्टर, Palm top यंत्रणा व तत्सम साधन सामुग्री उपलब्ध उपलब्ध करून दिल्यास बाष्पके संचालनालयाच्या कामाला गती मिळू शकेल. तसेच भविष्यामध्ये गरजेप्रमाणे अन्य लागणारी साधनसामग्री उपलब्ध करून देणे शक्य होईल,जेणेकरून बाष्पके संचालनालयाचे काम सुरळतीतपणे व सक्षमपणे करता येऊ शकेल.यासाठी संबधीत अधिकारी /कर्मचा-यांना प्रोजेक्टर,Palm top इत्यादिसारखी अद्ययावत यंत्रणा व तत्सम साधन सामुग्री उपलब्ध करून देणे.

२) भारतीय बाष्पके सुधारीत अधिनियम, २००७ मधील सुधारणाबाबत जनजागृती मोहीम राबविणे :- प्रस्तुत जनजागृती मोहीमेअंतर्गत बाष्पकांची तपासणी, त्यांची देखभाल याबाबतची माहीती स्थानिक वर्तमानपत्रांमध्ये देणे, तसेच याबाबत खाली नमुद केलेल्या बार्बीबाबत कुशल, अकुशल कामगार व अभियंते यांना बाष्पक अधिनियमातील बदललेल्या तरतुदींच्या अनुषंगाने चर्चासत्र आयोजीत करणे.

१) बाष्पक नैपुण्य अभियंता, बाष्पक परिचर, सांधाते व बाष्पक रासायनिक स्वच्छता करणारे कंत्राटदार यांना बाष्पकांचा सुरक्षित वापर व देखभाल याबाबत मार्गदर्शन / चर्चासत्र आयोजीत करणे.
२) बाष्पक निर्मिती, उभारणी व जोडकाम करताना गुणवत्ता जोपासणे व वार्षिक तपासणी व इतर वेळी बाष्पक रसायनांद्वारे स्वच्छ करताना घ्यावयाच्या काळजीबाबत चर्चासत्र आयोजित करणे.

३) बाष्पके कार्यालयासाठी नविन जागा खरेदी करणे :- बाष्पके संचालनालयाची बरीचशी कार्यालये भाडयाच्या जागेमध्ये कार्यरत आहेत. बाष्पके संचालनालयाचे कार्यालयाच्या भाडयापोटी दरवर्षी लाखो रुपये खर्च होतात.सदर भाडेपटटे फार जूने असल्यामुळे संबंधीत खाजगी जागा मालकांचे जागेचे भाडे वाढविण्याबाबत सारखे तगादे सुरू असतात. यावर उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने बाष्पके संचालनालयाच्या कार्यालयासाठी जिल्हास्तरावर कायमस्वरुपी नविन जागा खरेदी करणे.

४) बाष्पके संचालनालयाचे बळकटीकरण करण्याच्यादृष्टिने अन्य योजना राबविणे :-

बाष्पके संचालनालयाकडे सध्या बॉयलरच्या जोडणीसाठी वापरण्यात येत असलेल्या संसाधनांची तपासणी करण्यासाठी अद्ययावत यंत्रणा / साधनसामुग्री नाही.यासाठी सर्व साधनांनी सुसज्ज अशी प्रयोगशाळा (Laboratory)असणे आवश्यक आहे.तसेच विवीध कंपन्यांतील बाष्पक परिचर, बाष्पके अभियंता यांच्या नैपुण्यविषयक परिक्षा बाष्पके संचालनालयातर्फे वेळोवेळी घेण्यात येतात, यासाठी सर्वसोयींनीयुक्त अशी जागा बाष्पके संचालनालयाच्या मालकीची नसल्यामुळे फारच अडचणी येतात.बाष्पके संचालनालयाच्या बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स मधील कार्यालयाच्या वरच्या मजल्यावरील रिकाम्या जागेमध्ये आवश्यकतेनुसार यासाठी हॉल बांधता येऊ शकेल व या हॉलमध्ये बाष्पके परिचर, बाष्पके अभियंता यांच्या परिक्षा उत्तमप्रकारे व विहीत कालमर्यादेमध्ये आयोजीत करता येऊ शकतील,हया योजना तसेच अशा प्रकारच्या अन्य योजना राबविणे.

५. वरील योजनांसाठी होणारा खर्च मागणी क्र.के-४, मुख्यलेखाशिर्ष २२३०-कामगार व सेवायोजन, ०१ कामगार, १०२ कामाची पध्दत व सुरक्षितता,(००)(१५) ,बाष्पके संचालनालयाचे बळकटीकरण व बाष्पके अधिनियमाची प्रभावीपणे अंमलबजावणी (२२३० ५७८४) या लेखाशिर्षाखाली व त्या-त्या वर्षासाठी मंजुर केलेल्या अनुदानातून भागविण्यांत येईल.तसेच या योजनेसाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संचालक,बाष्पके कार्यालयातील संबधीत आहरण संवितरण अधिकारी काम पहातील.या योजनेअंतर्गत उपलब्ध नियतव्ययातून उपरोक्त उद्दीष्टांसाठीच खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

६. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२१४/१४६२,दिनांक २८/१०/२०१०तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.११३१/व्यय-१६/१०,दिनांक ०२/११/२०१० ला अनुलक्षून तसेच वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहीला उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७(२) अनुसार योजनेला प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारामध्ये निर्गमीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( डॉ.कविता गुप्ता )
प्रधान सचिव (कामगार)

प्रति,

प्रभारी संचालक,बाष्पके संचालनालय, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स,बांद्रा (पूर्व), मुंबई-५१

मा.राज्यमंत्री (कामगार)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
प्रधान सचिव (कामगार)यांचे स्वीय सहाय्यक, उ.ऊ.व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा अधिकारी, मुंबई
वित्त विभाग / व्यय-१६/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (प्रशासन-१/५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (कामगार-१)